**भूमीसंपादन, पुनवर्सन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपूर यांच्या कार्यालयातील एकूण १३ अस्थायी पदांना दिनांक १.९.२०२१ ते दिनांक २८.२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- आरपीए-२०१९प्र.क्र. ५६ /र-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ सप्टेंबर, २०२१.

**पहावे :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक आरपीए-१४१५/प्र.क्र.४५/र-१, दि.२०.१२.२०१६
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक आरपीए-२०१९प्र.क्र.५६/र-१,दिनांक २३.३.२०२१
३) शासन निर्णय, वित्त विभाग, पदनि२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १०.८.२०२१
४) निबंधक, भूमीसंपादन,पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपूर यांचे पत्र क्रमांक आस्था/ कार्या.क्र.१/ २०२१/११०, दिनांक ४.९.२०२१

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने भूमीसंपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम, २०१३ मधील कलम ५१ नुसार शासन निर्णय क्र. १ अन्वये भूमीसंपादन,पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरणाची स्थापना नागपूर येथे करण्यात आली असून त्यासाठी एकूण १३ पदे निर्माण करण्यात आली आहेत.

२. भूमीसंपादन,पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपूर यांच्या आस्थापनेवरील एकूण १३ अस्थायी पदांना संदर्भ क्र. २ अन्वये दि. १.३.२०२१ ते दि. ३१.८.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ दि. ३१.८.२०२१ रोजी संपुष्टात आली आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १०.८.२०२१ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ठ असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही,अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक १.९.२०२१ ते दिनांक २८.२.२०२२ पर्यत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहे. त्यानुसार निबंधक, भूमीसंपादन, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण,नागपूर यांनी केलेल्या विनंतीनुसार मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भूमीसंपादन, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना प्राधिकरण,नागपूर यांच्या कार्यालयातील पुढील १३ अस्थायी पदांना **दिनांक १.९.२०२१ ते दिनांक २८.२.२०२२** पर्यंत **(६ महिने)** या कालावधीसाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १०.८.२०२१ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रु.) | संख्या |
|---|---|---|---|
| १. | पिठासीन अधिकारी (जिल्हा न्यायाधीश)<br>Presiding Officer (District Judge) | रु.५१५००-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० | १ |
| २. | निबंधक (तहसिलदार) | एस-१९ (५५१००-१७५१००) | १ |
| ३. | अव्वल कारकून | एस-१२(३६१००-१०१६००) | २ |
| ४. | लघूलेखक | एस-१५ (४१८००-१३२३००) | १ |
| ५. | लिपिक | एस-६ (१९९००-६३२००) | ४ |
| ६. | वाहन चालक | एस-६ (१९९००-६३२०० | १ |
| ७. | शिपाई | एस-३ (१६६००-५२४००) | ३ |
| | | **एकूण** | **१३** |

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च मागणी क्र. सी-५ लेखाशिर्ष-२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण,०१- पुनर्वसन,२०२ इतर पुनर्वसन योजना,(०३) प्रकल्प बाधित व्यक्तींची पुनर्वसाहत,(०३) (०९) भुसंपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण (२२३५ सी ०६३) या लेखाशिर्षाखाली व सन २०२१-२०२२ च्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा,व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या क्रमांक पदनि २०१६/ प्र.क्र.८/१६ दि. १०.८.२०२१ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९१५१५०३२७९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prasannakumar Sadananda Thakur

Digitally signed by Prasannakumar Sadananda Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26565a6d8174436db1bdfcb621149f27a964fce785ca930cb445005a14b2f34d, serialNumber=912d3af3bfe3e0af035d456c0c6245a594837af9a454c08568f29dee42b50ce0, cn=Prasannakumar Sadananda Thakur
Date: 2021.09.15 15:04:56 +05'30'

**( प्र. स. ठाकूर )**
**कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) निबंधक,(तहसिलदार),भूमीसंपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण,नागपूर

३) महालेखापाल २, लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.

४) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

५) वित्त विभाग (आपुक कक्ष), मंत्रालय,मुंबई.

६) कार्यासन अधिकारी (ब-१, /ई-३), महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.

७) निवड नस्ती (र-१).